महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एल.एम.एन.-१०९९/प्र.क्र.४९/३५
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ४ फेब्रुवारी, २०००

पहा :- शासन निर्णय एल.एम.एन.-१०९१/७८१/सी.आर.-४८/अक
दिनांक १७ फेब्रुवारी, १९९२.

शासन निर्णय :-

राष्ट्रीय स्तरावर केंद्रीय अल्पसंख्याक आयोग कार्यरत आहे. त्याच धर्तीवर राज्यातील अल्पसंख्याकांच्या हिताची जोपासना व संरक्षण करण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र राज्य शासनाने राज्यात अल्पसंख्यांक आयोगाची पुर्नस्थापना करण्याचा निर्णय घेतला. त्यानुसार या शासन निर्णयाद्वारे तीन वर्षासाठी राज्य अल्पसंख्याक आयोग स्थापन करण्यात येत आहे.

२. राज्य अल्पसंख्याक आयोगाची रचना खालीलप्रमाणे राहील :-

अ) सदर आयोगात १ अध्यक्ष, १० सदस्य व एक विशेष कार्य अधिकारी यांचा समावेश राहील.

ब) सदर आयोगाचा कालावधी आयोग प्रत्यक्ष स्थापन झाल्याच्या दिनांकापासून ३ वर्षे इतका राहील.

क) आयोगाचे अध्यक्ष, इतर १० सदस्य व विशेष कार्य अधिकारी यांच्या नियुक्तीचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३. राज्य अल्पसंख्याक आयोगाची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-

अ) भारताच्या संविधानाद्वारे अल्पसंख्याकांचे रक्षण करण्यासाठी ज्या विविध संरक्षण उपाययोजना नमूद केलेल्या आहेत त्याची व राज्यशासनाने पारित केलेल्या विविध अधिनियमांचे मूल्यमापन करणे.

ब) उपरोक्त संरक्षण उपाययोजना व अधिनियम यांची परिणामकारक अंमलबजावणी होते किंवा नाही हे पाहण्यासाठी शिफारस करणे,

क) अल्पसंख्याकांच्या बाबतीत केंद्र/राज्यशासनाच्या धोरणाच्या अंमलबजावणीचा आढावा घेणे,

ड) अल्पसंख्यांक संरक्षक उपाययोजना व त्यांच्या अधिकारापासून त्यांना वंचित करण्यात येत असल्याबद्दलच्या विशिष्ट तक्रारींमध्ये लक्ष घालणे,

इ) अल्पसंख्यांकाच्या बाबतीत भेदभाव दाखविला जाऊ नये यासाठी विविध अभ्यास व विश्लेषणे हाती घेणे,

फ) केंद्र/राज्यशासनास कोणत्याही एका अल्पसंख्यांकाच्या उचित विधी व कल्याणार्थ करावयाच्या उपाययोजना सुचविणे.

म) अल्पसंख्यांकांच्या परिस्थितीविषयी माहिती गोळा करुन ती राज्य/राष्ट्रीय स्तरावर पुरविणे व

ह) अल्पसंख्याकांच्या तक्रारी व गा-हाणी सदर आयोगास ज्यावेळी प्राप्त होतील त्यावेळी त्यांची चौकशी करुन आपला अहवाल राज्यशासनास सादर करणे.

ई) राज्यशासनास वार्षिक अहवाल व शिफारशी सादर करणे.



02012515034000-0100

४. आयोगावर सोपविलेली जबाबदारी पार पाडण्यासाठी स्वत:ची कार्यपध्दती राज्य अल्पसंख्यांक आयोग ठरविल. सदर आयोगास आवश्यकता भासेल त्याप्रमाणे राज्यशासनाचे सर्व विभाग व इतर कार्यालये आवश्यक ती माहिती व कागदपत्रे वेळोवेळी आयोगास सादर करतील तसेच, राज्य शासनाचे विविध उपक्रम सदर आयोगास आवश्यक ते सहकार्य व मदत उपलब्ध करुन देतील.

५. राज्य अल्पसंख्याक आयोगाचे कार्यालय व कर्मचारी, अध्यक्ष, सदस्य आणि विशेष कार्यकारी अधिकारी यांची नियुक्ती, अध्यक्षांना दयावयाचे मानधन व सदस्यांना दयावयाचा दैनिक भत्ता व इतर सुविधाबाबत जरुर ते आदेश वित्त विभागाच्या सल्ल्याने स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही/-

( शं.वि.नलावडे )

उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग.

प्रति,

१. राज्यपालांचे सचिव,
२. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
३. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
७. सर्व विभागीय आयुक्त,
८. सर्व जिल्हाधिकारी,
९. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषदा,
१०. सर्व मंत्रालयीन विभाग,
११. मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग व कार्यालय प्रमुख,
१२. राज्यशासनाचे सर्व उपक्रम,
१३. प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
१४. प्रबंधक, अपीलशाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
१५. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त कार्यालय, मुंबई,
१६. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
१७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१८. महासंचालक, माहिती व जनसंर्क महासंचालनालय, मुंबई, (प्रसिध्दीसाठी),
१९. निवड नस्ती,
२०. मुख्य सचिव/प्र.सचिव/सचिव ( सा.प्र. ) यांचे स्वीय सहाय्यक. ( सा.आ.)

R 200201251503440000-0100